**अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या धर्मादाय संघटनेतील शिपाई (गट-ड) या संवर्गातील कर्मचारी यांचेकरीता अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- सीएचए-२०२३/प्र.क्र.११९/कार्या-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १४ जुलै, २०२३.

**संदर्भ :** १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब,दि.२१.१२.२०१९
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ए/१६-ब,दि.३०.०६.२०२०
३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ए/१६-ब,दि.२८.०९.२०२०
४) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. बीसीसी २०१९/प्र.क्र.५८१ए/१६-ब,दि.१४.१२.२०२२
५) मा. सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती जात प्रमाणपत्र तपासणी समिती, अमरावती यांचे आदेश क्र. सआ/अजप्रतस/अम/५-ST/२०१३/११५८१, दि.२८.१२.२०२२
६) धर्मादाय उप आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे पत्र क्र. आस्था/२५६६/२०२३,दि.१७.०५.२०२३

**प्रस्तावना :**

मा. सर्वोच्च न्यायालयाचे सिव्हिल अपील क्र.९८२८/२०१५ व इतर याचिका मध्ये दि.०६.०७.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने, संदर्भ क्र. १येथील शासन निर्णयान्वये, अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेले अधिकारी/कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत असतील त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करुन त्यांना मानवतावदी दृष्टिकोनातून तसेच प्रशासनाची होणारी अडचण दूर करण्यासाठी, त्यांच्या सेवा ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकास सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर वर्ग करण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत. याकरीता संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये, अधिसंख्य पद निर्माण करण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आले आहेत.

धर्मादाय संघटनेत सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय, अकोला विभाग, अकोला येथे शिपाई पदावर कार्यरत श्री. कृष्णा महादेव इंगळे यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र संदर्भ क्र. ५ येथील आदेशान्वये अवैध ठरविण्यात आले आहे. संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयांतील तरतुदी विचारात घेता, श्री. कृष्णा महादेव इंगळे यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्याकरीता ०१ अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

धर्मादाय संघटनेत सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय, अकोला विभाग, अकोला येथे सद्य:स्थितीत शिपाई पदावर कार्यरत श्री. कृष्णा महादेव इंगळे यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्यात आले असल्यामुळे, त्यांच्याकरीता धर्मादाय संघटनेत शिपाई (गट-ड) या संवर्गात ०१ अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत आहे.

२. धर्मादाय आयुक्त यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.२१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-क मधील नमुन्यानुसार आदेश निर्गमित करून श्री. कृष्णा महादेव इंगळे यांची सेवा तातडीने अधिसंख्य पदावर वर्ग करावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर अधिसंख्य पदावर कार्यरत कर्मचारी - श्री. कृष्णा महादेव इंगळे यांना संदर्भधीन दि.१४.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयानुसार प्रथम ११ महिन्यांकरीता व प्रत्येक वेळी १ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन पुन्हा ११ महिन्यांच्या कालावधीकरीता अशाप्रकारे त्यांच्या सेवा सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत सुरु ठेवाव्यात. तसेच, त्यांना पदोन्नती व अनुकंपा धोरणाचा लाभ मिळणार नाही.

४. सदर अधिसंख्य पदाच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित कर्मचारी सध्या ज्या कार्यालयात आहेत त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि. २१.१२.२०१९ व दि.१४.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील नमूद सुचनांनुसार आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील.

६. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९ आणि शासन निर्णय क्रमांक बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ए/१६-ब, दि.३०.०६.२०२० अन्वये प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१४१७०१४६८७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANISHA ANIL KADAM

Digitally signed by MANISHA ANIL KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=6e49954abe1615213c9867d36416b4646311d3a20fa0e8638f40554d1f74d87b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=46C6AAD763D6F6FE01CAEF299F7BF533D85983B1491695AAAE025643F38D12D4, cn=MANISHA ANIL KADAM
Date: 2023.07.14 17:04:45 +05'30'

**( मनिषा कदम )**
**सहायक सॉलिसिटर नि उप सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
२. मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे सचिव.
३. महालेखापाल, लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. धर्मादाय सह आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).
६. धर्मादाय उप आयुक्त, सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय, अकोला (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).
७. अधिदान व लेखा अधिकारी, अकोला.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
९. लेखा संचालक, धर्मादाय आयुक्त कार्यालय, मुंबई.
१०. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१६-ब), मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग (आपुक/व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१२. विधि व न्याय विभाग (कार्यासन १७), मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (का-१).